**सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणाचा आस्थापना खर्च या बाबींची पूर्तता करण्यासाठी "लेखाशिर्ष २२१० के ०१४ ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" अंतर्गत BEAMS प्रणालीवर उपलब्ध असलेली रु.१.५० कोटी इतकी रक्कम वितरित करुन खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरमा-१४२३/प्र.क्र.१४४/आरोग्य-८**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २४ जुलै ,२०२४

**वाचा :-**

मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र. १८७५-८१/मवैवखाप्रा/लेखा कक्ष/२०२४ दिनांक १९.०६.२०२४

**प्रस्तावना :-**

मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी वाचा मधील दिनांक १९.०६.२०२४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणाचा आस्थापना खर्च या बाबींची पूर्तता करण्यासाठी "लेखाशिर्ष २२१० के ०१४ ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) "अंतर्गत अर्थसंकल्पीत केलेल्या रु.४.५० कोटी इतक्या रकमेपैकी BEAMS प्रणालीवर उपलब्ध असलेली रु.१.५० कोटी (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त) इतकी रक्कम प्राधिकरणास वितरित करुन खर्च करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू प्राधिकरणाच्या आस्थापना खर्च या बाबींची पूर्तता करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० के ०१४ ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) अंतर्गत अर्थसंकल्पित केलेल्या रु.४.५० कोटी इतक्या रकमेपैकी BEAMS प्रणालीवर उपलब्ध असलेली रु.१.५० कोटी (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त) इतकी रक्कम लेखाशिर्ष २२१० K०१४ अंतर्गत ३१- सहायक अनुदाने वेतनेतर या उदिष्टाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर व उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतुन भागविण्यात येणार आहे.

३.   सदर निधी वितरणाचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

**विवरणपत्र-अ**

**अ-अनुदानाचा तपशील**

**(रक्कम लाखात)**

| अ. क्र | लेखाशिर्ष | सांकेतांक | अर्थसंकल्पिय तरतुद (मूळ) | BEAMS प्रणालीवर उपलब्ध अनुदान | मागणी रक्कम (प्रस्ताव) |
|---|---|---|---|---|---|
| १ | आर-१ २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ सार्वजनिक आरोग्य, ८०० इतर खर्च सर्वसाधारण योजना (०३) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण (०३)(०१) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणाचा आस्थापना खर्च (अनिवार्य) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | (२२१०K०१४) | ४५०.०० | १५०.०० | १५०.०० |

**४.**   सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४ रोजीच्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.०८ येथील १ ते १० मधील अटींची पुर्तता केल्याचे प्रमाणपत्र तसेच उपयोगिता प्रमाणपत्र मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी सादर केलेले आहे.

**५.**   सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू प्राधिकरणाच्या आस्थापना खर्च या बाबींची पूर्तता करण्यासाठी अर्थसंकल्पीत केलेल्या रु.४.५० कोटी इतक्या रकमेपैकी BEAMS प्रणालीवर उपलब्ध असलेली रु.१.५० कोटी इतकी रक्कम महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यासाठी खालील नमुद अटींच्या अधिन राहून प्रस्तावित करण्यात येत आहे:-

(१)   सदर निधी खर्ची करण्याच्या अनुषंगाने वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच सदर वितरित निधी खर्ची पडल्यानंतर त्याबाबतचा अहवाल सादर करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू प्राधिकरण, मुंबई यांची राहील.

(२)   वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू प्राधिकरण, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल, २०२४ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्टातील अ.क्र.०८ मधील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

(३)   सदरचा खर्च मागणी क्र.आर-१,२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ -सार्वजनिक आरोग्य, ८०० -इतर खर्च, सर्वसाधारण योजना (०३) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण ,(०३)(०१) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणाचा आस्थापना खर्च (अनिवार्य) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)

“लेखाशिर्ष २२१० के ०१४” या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा व सन २०२४-२५ च्या मंजूर व उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा .

(४) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि/-२०२२/प्र.क्र.-२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

(५) यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखा परिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी प्रमाणित केलेले आहे.

(६) सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणाच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

(७) सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी पुरवठादाराच्या/लाभार्थ्याच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल, २०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन झाल्याचे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी प्रमाणित केलेले आहे.

(८) सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे.

(९) वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

(१०) शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणाच्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व दिनांक १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/ अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई यांना बंधनकारक राहील.

(११) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरणाची सहायक अनुदानाची देयके कोषागारातुन आहरीत करुन मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई यांना संवितरीत करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

**६.** उपरोक्त परिच्छेद क्र.०४ मधील अट क्र.(१) ते (११) ची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई यांची राहील.

७. सदरचे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२३१२०४१११८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2024.07.24 12:23:17 +05'30'

**(विकास तु. कदम)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

प्रति:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
८) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
१०) निवडनस्ती (आरोग्य-८)